**राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर हॉस्पीटल, नागपूर (संस्था क्रमांक ०५९२) या संस्थेस RS- ॲडव्हान्स डिप्लोमा इन एक्सरे रेडिओग्राफी ॲन्ड अल्ट्रा सोनोग्राफी टेक्निशिअन हा अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेला परंतु, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेला अल्प मुदतीचा अभ्यासक्रम सुरु करण्यास शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मान्यता-२०१८/(१६३/१८)/तांशि-५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १ ऑगस्ट, २०१८**

**संदर्भ : १)** उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक मान्यता-२०१०/(२४१/१०)/तांशि-५, दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०१०.

**२)** महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ यांचे जा.क्र.मरातंशिमं/का-५३/RS/०५९२/२०१८/३८९१, दिनांक : २१ जून, २०१८.

**<u>प्रस्तावना</u> :**

राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर हॉस्पीटल, नागपूर (संस्था क्रमांक ०५९२) या संस्थेस RS- ॲडव्हान्स डिप्लोमा इन एक्सरे रेडिओग्राफी ॲन्ड अल्ट्रा सोनोग्राफी टेक्निशिअन हा अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या अखत्यारीत नसलेला परंतु, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेला अल्प मुदतीचा अभ्यासक्रम सुरु करण्यास संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली होती. सदर शासन निर्णयातील अट क्रमांक १४ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या संस्थांनी शासन निर्णयाच्या दिनांकापासून सदर अभ्यासक्रम दोन शैक्षणिक वर्षापर्यंत सुरु करणे आवश्यक होते. तथापी, सदर संस्थेने या दोन वर्षाच्या कालावधीत मान्यता देण्यात आलेला अभ्यासक्रम सुरु केलेला नाही. आता संस्थेने सदर शासन निर्णयातील अट क्रमांक १४ शिथील करुन सदर अभ्यासक्रमास शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून मान्यता देण्याची विनंती केलेली आहे. त्या अनुषंगाने उपसचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, विभागीय कार्यालय, नागपूर यांनी सदर संस्थेत RS- ॲडव्हान्स डिप्लोमा इन एक्सरे रेडिओग्राफी ॲन्ड अल्ट्रा सोनोग्राफी टेक्निशिअन हा अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सुरू करण्याची शिफारस मंडळाकडे केलेली असून सदर शिफारशीच्या अनुषंगाने हा अभ्यासक्रम सुरू करण्यास शासन मान्यता देण्यास मंडळाची हरकत नसल्याचे मंडळाने संदर्भ क्र.२ येथील दिनांक २१.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

त्यास अनुसरून सदर अभ्यासक्रम सन २०१८-१९ पासून सुरू करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रसंत तुकडोजी रिजनल कॅन्सर हॉस्पीटल, नागपूर (संस्था क्रमांक ०५९२) या संस्थेस RS- ॲडव्हान्स डिप्लोमा इन एक्सरे रेडिओग्राफी ॲन्ड अल्ट्रा सोनोग्राफी टेक्निशिअन हा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या अखत्यारीत असलेला अल्प मुदतीचा अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) सदर अभ्यासक्रम १.५ वर्षे पूर्णवेळ सत्रपध्दत याप्रमाणे राहील. तसेच सदर अभ्यासक्रमासाठी प्रवेशक्षमता ६० इतकी मर्यादित राहील.

३) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी नेमावे व नियमाप्रमाणे वेतन व भत्ते कर्मचाऱ्यांना देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

४) सदर अल्पमुदतीच्या अभ्यासक्रमासाठी संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे. तसेच या शासन निर्णयाद्वारे मंजूर प्राप्त अभ्यासक्रम अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने राबविण्याचे ठरविल्यास सदर अभ्यासक्रमांना परिषदेची मान्यता घेणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

५) व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी शासनाचे फी प्रतिपूर्तीचे जरी धोरण असले तरी, त्यामध्ये कोणत्याही नॉन ए.आय.सी.टी.ई. च्या अभ्यासक्रमांना फी प्रतिपूर्ती योजना लागू नाही. त्यामुळे वरील अभ्यासक्रमाकरीता फी प्रतिपूर्ती योजना कोणत्याही प्रवर्गातील विद्यार्थ्यांना लागू राहणार नाही. आर्थिकदृष्टया मागास असलेल्या विद्यार्थ्यांना देखील फी प्रतिपूर्ती/सवलत योजना लागू होणार नाही.

६) शासनाने विहित केलेल्या तसेच, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल.

७) सदर संस्थेने नियमित शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी नियुक्ती, यंत्रसामुग्री व अद्यावत प्रयोगशाळा आणि मानकांप्रमाणे ग्रंथालय सुविधा विद्यार्थ्यांना देत असल्याबाबत शपथपत्र संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी घ्यावे. याबाबींची पूर्तता करुन घेण्याची सर्वस्वी जबाबदारी उप सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ ,विभागीय कार्यालय,नागपूर यांची राहील.

८) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, ब्रांद्रा, मुंबई यांच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे.

९) सदर संस्था संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांच्या नियंत्रणाखाली राहील व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, बांद्रा, मुंबई यांचेकडून घेतल्या जातील.

१०) सदर अल्पमुदतीच्या अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार/ पध्दतीनुसार करण्यात येतील.

११) सदर शासन निर्णयांन्वये मान्यता मिळालेला अभ्यासक्रम संस्थेने शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सुरू करणे आवश्यक राहील. संस्थेने सदर अभ्यासक्रम त्याप्रमाणे सुरू न केल्यास संस्थेला सदर अभ्यासक्रमाकरीता देण्यात आलेली मान्यता आपोआप रद्द होईल.

१२) विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संस्थेने आकारल्यास संस्थेवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ नुसार कारवाई करण्यात येईल.

१३) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१४) याशिवाय संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संस्थेस लागू राहतील.

१५) शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंतर्भूत करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०११७४०५९५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.08.01 18:00:08 +05'30'

**(अ. र. काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई,
३. उप सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, विभागीय कार्यालय, नागपूर,
४. संबंधित संस्था (मंडळामार्फत),
५. निवड नस्ती/तांशि-५